**सहायक अनुदानाच्या देयकांची प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे (Utilisation Certificates - UCs) सादर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. : विनिप-०९/ प्र.क्र. (२९/२०१६)/पीएसी-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक:- ०८ डिसेंबर, २०२१

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग शासन परिपत्रक. क्र. मआख-१०.०५/प्र.क्र.७८/०५/विनियम, दिनांक १६.१२.२००५.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. मुंविनि -१००७/प्र.क्र.२२/०७/विनियम, दिनांक १३.२.२००८.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक. क्र. मआख-२०१४/प्र.क्र.४२/विनियम, दिनांक ०९.१०.२०१४.
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. मुंविनि-१०१६/प्र.क्र.०६/२०१६/विनियम, दिनांक १९.१०.२०१६.
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. मुंविनि-२०१७/प्र.क्र.३८/२०१७/विनियम, दिनांक १८.१२.२०१७.
६) अप्पर मुख्य सचिव (महसूल) यांचे अ. शा. पत्र क्र. विनिप-०५/प्र.क.(२९/२०१६)/पीएसी-१ दि.९/७/२०२१.
७) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे अशा पत्र क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.३०/२०२०, दिनांक ११.८.२०२१

**प्रस्तावना :-**

मुंबई वित्तीय नियम १९५९ च्या नियम १४९ मधील परिशिष्ट - २२ अन्वये सहायक अनुदाने मंजुर करण्याची कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे. तसेच वित्त विभागाने सदर बाबत वेळोवेळी संदर्भिय शासन परिपत्रकान्वये उपयोगिता प्रमाणपत्राबाबत सुचना निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुसार मंजुर करण्यात आलेले सहायक अनुदानाच्या रकमा (Grant in Aid) एका वर्षाच्या आत खर्च करावयाच्या असून जर काही निधी अखर्चित राहत असेल तर त्या रकमा शासन खाती परत करून उर्वरित निधीचे विहित नमुन्यात उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल मुंबई / नागपूर / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई कार्यालयास सादर करण्याची तरतुद आहे.

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांनी दिनांक ३१.३.२०१९ रोजी सादर केलेल्या राज्य वित्तीय व्यवस्थेवरील अहवालात **" उपयोगिता प्रमाणपत्र सादर न करणे / सादर करण्यातील विलंब"** ( परिच्छेद क्रमांक - ३.१) या शिर्षाखाली परिच्छेद घेतला असून त्या अहवालात एकूण ९४४ उपयोगिता प्रमाणपत्रे महसूल व वन विभागाकडे प्रलंबित असल्याचे नमूद केले आहे. उपयोगिता प्रमाणपत्रे सादर न करणे हे विशिष्ट प्रयोजनाकरीता मंजुर झालेल्या निधीच्या वापरावर विभागाचे योग्य संनियत्रण नसल्याचे तसेच आर्थिक वर्षासाठी विधानमंडळाने मंजुर केलेल्या कारणासाठीच निधीचा वापर झाल्याची शाश्वती नसल्याचे म्हटले असून प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रामुळे निधीचे दुर्विनोयजन व अफरातफरीचा धोका उद्भवु शकतो असे नमुद केलेले आहे.

विभागाच्या संदर्भ पत्र क्र.६ च्या अ.शा. पत्रानुसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील दिनांक ३१ मार्च २०२१ अखेर प्रलंबित असलेल्या उपयोगिता प्रमाणपत्रांचा निपटारा करण्याबाबत सर्व संबधीतांना कळविण्यात आले आहे. तसेच अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांच्या दिनांक ११.८.२०२१ च्या अ.शा. पत्रान्वये विभागांनी कालबध्द कार्यक्रम आखुन दिनांक ३१.१०.२०२१ पर्यंत सर्व प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश दिले आहेत अन्यथा पुढील आर्थिक वर्षापासून संबधित लेखाशिर्षाखाली कोणत्याही सहायक अनुदानाच्या रकमा मंजुर करण्यात येणार नाहीत व सहायक अनुदानाची देयके देखील मंजुर करण्यात येणार नाही असे कळविले आहे.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

महसूल व वन विभागाच्या अखत्यारीत असलेल्या सर्व आहरण व संवितरण अधिकारी / नियंत्रक अधिकारी यांना प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करण्याबाबत खालील प्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

१. प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्राची यादी महालेखापाल मुंबई / नागपूर यांच्या संकेतस्थळावर Online Reconciliation Module मध्ये उपलब्ध करून देण्यात येते. तसेच मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्यातील आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई कार्यालयाकडून प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्राची यादी प्राप्त करून घ्यावी. सदर प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रापैकी आपल्या कार्यालयाची कोणती उपयोगिता प्रमाणपत्रे प्रलंबित आहेत ते प्रथम तपासावे व प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रापैकी माहे डिसेंबर - २०२१ अखेर त्याची उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित महालेखापाल / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना सादर होतील असे पहावे.

२. माहे डिसेंबर - २०२१ च्या शेवटच्या आठवडयात निकाली काढलेल्या उपयोगिता प्रमाणपत्रांच्या संदर्भात आढावा घेऊन सर्व विभागीय आयुक्त, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे व जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयानी त्यांच्या अधिनस्त कार्यालयांचा जिल्हानिहाय एकत्रित अहवाल शासनास सादर करावा.

३. वित्त विभागाच्या सदर्भिय दिनांक ११.०८.२०२१ च्या अ.शा. पत्रान्वये कळविल्याप्रमाणे जर प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रा अभावी पुढील आर्थिक वर्षात सहायक अनुदान मंजुर झाले नाही / देयके पारीत झाली नाही तर संबधितावर शिस्तभंगाची कार्यवाही विभागीय आयुक्त, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे व जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

४. वित्त विभागाच्या सर्व संदर्भीय शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सुचना विभागाच्या आहरण व संवितरण अधिकारी / नियंत्रक अधिकारी यांच्या पुन:श्च निदर्शनास आणुन देण्यात येत असून त्यांनी उपयोगिता प्रमाणपत्राबाबत वित्त विभागाच्या उपरोक्त शासन परिपत्रकान्वये विहीत कालमर्यादेत कार्यवाही पुर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. विभागाच्या सर्व कार्यासनांनी सहायक अनुदानाच्या रकमांचे अधिनस्थ कार्यालयांना करण्यात येणाऱ्या अनुदान वितरणाच्या आदेशात उपयोगिता प्रमाणपत्र शासनास, संबधीत महालेखापाल कार्यालय व

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना विहित मुदतीत सादर करावीत असे आवश्य नमूद करावे व पुढील अनुदान वाटप करताना मागील वाटप केलेल्या रकमांचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याची खात्री करावी.

६. तरी सर्व विभागीय आयुक्त, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे व जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयातील प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्र विहीत कालावधीत सादर करण्याबाबत व्यक्तीश: लक्ष देऊन भविष्य काळात उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबितता कमी करण्यासाठी योग्य ती कार्यवाही विहीत कालावधीत करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२११२०८१६४७३१५३१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb279823a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2021.12.08 16:51:59 +05'30'

**( अ. सो. देशमुख )**
**उप सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (महसूल) / अपर मुख्य सचिव ( मदत व पुर्नवसन) यांचे स्वीय सहायक,
२. महसूल व वन , मदत व पुर्नवसन विभागातील सर्व संबंधित सह सचिव / उप सचिव

**प्रत :-**

१. विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक / पुणे / औरंगाबाद / अमरावती / नागपूर
३. जमाबंदी आयुक्त, व संचालक, भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) १ व २, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६. जिल्हाधिकारी (सर्व).
७. वित्त विभाग (लोलेस), मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती पी ए सी - १.